काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पांच्या जलवहन प्रणालीची काही स्थापत्य कामे मंजूर आराखडा व संकल्पचित्रानुसार न झाल्याने त्यावर उपाय योजना सूचविण्यासाठी तांत्रिक समितीचे गठण

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा-१२१०/(२६७/१०)/जवि
मंत्रालय मुंबई.
दि. ०२.१२.२०११.

**प्रस्तावना :-** काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पांच्या जलवहन प्रणालीची काही स्थापत्य कामे मंजूर आराखडा व संकल्पचित्रानुसार न झाल्याने त्यांचे आर्थिक व तांत्रिक परिणाम निश्चित सुचविण्यासाठी एका तांत्रिक समितीचे गठण करण्याबाबतचा विषय शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पांच्या जलवहन प्रणालीची काही स्थापत्य कामे मंजूर आराखडा व संकल्पचित्रानुसार न झाल्याने त्यांचे आर्थिक व तांत्रिक परिणाम निश्चित करुन त्यावर उपाय योजना सूचविण्यासाठी श्री. मो.ई.शेख मु.अ.(पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे तांत्रिक समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | श्री. मो.ई.शेख मु.अ.(पा) व सहसचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | : | अध्यक्ष |
| २) | मुख्य अभियंता, कोकण प्रदेश मुंबई | : | सदस्य |
| ३) | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प, पुणे. | : | सदस्य |
| ४) | अधिक्षक अभियंता घाटघर, (विवयां) मंडळ, कळवा. | : | सदस्य |
| ५) | अधिक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे. | : | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पातील जलवहन प्रणालीचे काम संकल्पचित्र संघटनेने तयार केलेल्या व मंजूर आराखडयानुसार तसेच संकल्पचित्राप्रमाणे न केल्याने शासनावर येणारा अतिरिक्त आर्थिक भार निश्चित करणे. आर्थिक भार निश्चित

करतांना खोदकाम, अस्तरीकरण, रिनफोर्समेंट, आधारव्यवस्था, विद्युत व यांत्रिकी कामे व संलग्न बाबींचे परिमाण या मधील वाढ, तसेच विविध बाबीच्या आकारमानात बदल झाल्याने दरातील फरकामुळे होणारी वाढ विचारात घेणे.

२) संकल्पचित्रानुसार स्थापत्य कामे न झाल्याने उर्वरित स्थापत्य, विद्युत व यांत्रिकी कामावर होणारे जलशास्त्रीय (Hydraulics), तांत्रिक व आर्थिक परिणाम निश्चित करुन उपाययोजना सूचविणे.

३) प्रकल्पाची कामे पूर्ण करुन दोन्ही प्रकल्प कालबध्द पध्दतीने यशस्वी पणे कार्यान्वित करणेबाबत करावयाच्या ठोस प्रशासकीय उपाययोजना सूचविणे.

३. तांत्रिक समितीने दोन महिन्यामध्ये अहवाल शासनास सादर करावा.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११११२०२००३००१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्र.म.अबनावे)
शासनाचे उप सचिव

१) मा. मंत्री जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य अभियंता (जलसंपदा) व सहसचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) श्री. मो.ई.शेख मु.अ.(पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य अभियंता, कोकण प्रदेश मुंबई
७) मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प, पुणे.
८) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
९)अधिक्षक अभियंता घाटघर, (विवयां) मंडळ, कळवा.
१०)अधिक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे.
११) अधिक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
१२) जलविद्युत कार्यासन संग्रहार्थ